**ग्रामपंचायत माण, ता.मुळशी जि.पुणे या स्थानिक प्राधिकरणास जि.प.प्राथमिक शाळा, भोईरवाडी (माण), ता.मुळशी, जि.पुणे या प्राथमिक शाळेला जोडून माध्यमिक ते उच्च माध्यमिकचे वर्ग स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरू करण्यास परवानगी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०२४/प्र.क्र.१०२७/एसएम- २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०२ एप्रिल, २०२५

**वाचा -**

१) महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम-२०१२, दि.१९/०१/२०१३
२) शासन निर्णय क्रमांक-प्राशाव-२०२३/प्र.क्र.९७/एसएम-५, दि.१५/०३/२०२४
३) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.प्राशिसं/टे-३०१/ २०२४/ ६१७१, दि.२०/०९/२०२४

**प्रस्तावना :-**

जि.प.प्राथमिक शाळा, भोईरवाडी (माण), ता.मुळशी, जि.पुणे या प्राथमिक शाळेला जोडून माध्यमिक ते उच्च माध्यमिकचे वर्ग स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरू करण्यास ग्रामपंचायत माण, ता.मुळशी जि.पुणे या स्थानिक प्राधिकरणास परवानगी देणेबाबत संदर्भ क्र. (३) अन्वये शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास प्रस्ताव सादर केलेला होता. त्यानुषंगाने ग्रामपंचायत माण, ता.मुळशी जि.पुणे या स्थानिक प्राधिकरणास जि.प.प्राथमिक शाळा, भोईरवाडी (माण), ता.मुळशी, जि.पुणे या प्राथमिक शाळेला जोडून माध्यमिक ते उच्च माध्यमिकचे वर्ग स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरू करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अंतर्गत ग्रामपंचायत माण, ता.मुळशी जि.पुणे या स्थानिक प्राधिकरणास जि.प.प्राथमिक शाळा, भोईरवाडी (माण), ता.मुळशी, जि.पुणे या प्राथमिक शाळेला जोडून माध्यमिक ते उच्च माध्यमिकचे वर्ग (इ.९ वी ते इ.१२ वी, मराठी माध्यम, राज्यमंडळ) स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सन २०२५-२६ या शैक्षणिक वर्षापासून सुरू करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन स्तरावरुन परवानगी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | शाळेचे नाव व पत्ता | माध्यम | मंडळ | शाळेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | जि.प.प्राथमिक शाळा, भोईरवाडी (माण), ता.मुळशी, जि.पुणे | मराठी | राज्यमंडळ | दर्जावाढ, माध्यमिक ते उच्च माध्यमिक (इ.९ वी ते इ.१२ वी) |

**अटी व शर्ती :-**

I. सदर माध्यमिक ते उच्च माध्यमिक करीता दर्जावाढ करण्यास कोणत्याही खर्चाकरीता, राज्य शासनाकडून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असे कोणतेही वित्तीय सहाय्य/ अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

II. बालकांच्या मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम, २००९ मधील तरतुदी, प्राथमिक व माध्यमिक शाळांबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण व निकष यांचे पालन करणे तसेच शाळेमध्ये आवश्यक वर्गखोल्या, सर्व भौतिक व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

III. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अन्वये निर्धारित केलेल्या सर्व मानकांचे, अटींचे व शर्तींचे आणि या अधिनियमांन्वये शासनाने दिलेल्या निदेशांचे किंवा शासनाने वेळोवेळी विनिर्दिष्ट केलेल्या मानकांचे किंवा अटीं व शर्तींचे पालन करणे अनिवार्य राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०४०२१४५५३६९४२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAMOD VITHOBA KADAM

Digitally signed by PRAMOD VITHOBA KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=f82b9e0b005ed06987e1ae26683203c8f241022e0aad6b1c827af561b72f83bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF4901BED6A4BEE0ED963C63F1B0172A4718894A400C0988FBB3381DB913696F, cn=PRAMOD VITHOBA KADAM
Date: 2025.04.02 14:56:28 +05'30'

**( प्रमोद कदम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे.
७. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद, पुणे.
८. निवडनस्ती (१०२७/२०२४)(एसएम-२).